**मुंबई विद्यापीठातील उपकुलसचिव आणि सहायक कुलसचिव या पदांच्या भरती प्रक्रियेसंदर्भात समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय: संकिर्ण -२०२१/प्र.क्र.१३४/विशि-१,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- ९ ऑगस्ट,२०२४

**वाचा:-** शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २८ ऑगस्ट,२०२३.

**प्रस्तावनाः -**

मुंबई विद्यापीठाकडून सन २००९ ते सन २०१३ या कालावधीत उप कुलसचिव आणि सहायक कुलसचिव या पदांकरिता भरती प्रकिया राबविण्यात आली होती. सदर भरती प्रक्रियेसंदर्भात शासनास तक्रारी प्राप्त झाल्या होत्या. त्यास अनुसरून भरती प्रक्रियेची चौकशी करण्यासाठी संदर्भीत दिनांक २८ ऑगस्ट,२०२३ च्या शासन निर्णयान्वये डॉ.एस.आर.माळी यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समिती गठित करण्यात आली होती. सदर समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. मात्र समितीसमोर संबंधित अधिकाऱ्यांना त्यांचे म्हणणे मांडण्याची संधी मिळाली नसल्याचे दिसून आले. त्या अनुषंगाने नैसर्गिक न्याय तत्वानुसार, सदर भरती प्रक्रियेतील सर्व संबंधित अधिकाऱ्यांना त्यांची बाजू मांडता यावी यासाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुंबई विद्यापीठाकडून सन २००९ ते सन २०१३ या कालावधीत उप कुलसचिव आणि सहायक कुलसचिव या पदांकरिता भरती प्रक्रिया राबविण्यात आली होती. सदर भरती प्रक्रियेतील सर्व संबंधित अधिकाऱ्यांना त्यांची बाजू मांडता यावी यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे:-

| क्र | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रा.नितीन रघुनाथ करमळकर, माजी कुलगुरू, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे. | अध्यक्ष |
| २ | प्रा.पी.पी.माहुलीकर, माजी प्र.कुलगुरू, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ,जळगाव | सदस्य |
| ३ | डॉ.परवीन सय्यद, वरीष्ठ विधि अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे | सदस्य सचिव |

०२. समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१) मुंबई विद्यापीठाकडून २००९ ते २०१३ या कालावधीत उप कुलसचिव आणि सहायक कुलसचिव ह्या पदांकरिता राबविण्यात आलेल्या भरती प्रक्रियेतील सर्व संबंधित अधिकाऱ्यांची वैयक्तिक सुनावणी घेऊन त्यांची बाजू मांडण्याची संधी द्यावी.

२) भरती प्रक्रियेची चौकशी करण्यासाठी दिनांक २८ ऑगस्ट,२०२३ च्या शासन निर्णयान्वये नेमण्यात आलेल्या समितीचा (डॉ.माळी समिती) अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. त्या अनुषंगाने सर्व संबंधित अधिकाऱ्यांची बाजू ऐकून डॉ.माळी समितीने नोंदविलेल्या निष्कर्षासंदर्भात अधिकारीनिहाय अभिप्राय एक महिन्यात शासनास सादर करावेत.

०३. उपरोक्त समितीच्या बैठकांचे आयोजन मुंबई विद्यापीठाने करावे. तसेच समितीमधील अशासकीय सदस्यांचे मानधन व प्रवासभत्ता मुंबई विद्यापीठाने अदा करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०९१६२२५६८००८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP
PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2024.08.09 16:37:32 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन.
२) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
४) कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
५) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
७) प्रा.नितीन रघुनाथ करमळकर, माजी कुलगुरू,सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
८) प्रा.पी.पी.माहुलीकर,माजी प्र.कुलगुरू कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ,जळगाव.
९) डॉ.परवीन सय्यद, वरीष्ठ विधि अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
१०) निवड नस्ती (विशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.